पुणे वनवृत्तातील कात्रज येथील येथील वनजमिनीवर संरक्षण भिंत बांधण्याच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०१६/प्र.क्र.६१०/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १७ जानेवारी, २०१७.

**वाचा :-**

अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे पत्र क्र.-कक्ष-२४(३)/वअ/५२०/२०१५-१६, दिनांक १७.०९.२०१५.

**प्रस्तावना :**

राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन योजनेअंतर्गत पुणे वनवृत्तातील कात्रज येथील वनजमिनीवर संरक्षण भिंत बांधकाम करण्यासाठीच्या अंदाजपत्रकास वनअभियंता, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांची तांत्रिक मान्यता घेवून सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबतचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी उपरोक्त संदर्भिय पत्रान्वये शासनास सादर केला होता व सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१) पुणे वनवृत्तातील कात्रज येथील वनजमिनीवर संरक्षित भिंतीचे बांधकाम करण्यासाठीच्या अंदाजपत्रकास खालील नमूद तपशिलाप्रमाणे प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) प्रदान करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | कामाचे नाव | प्रशासकिय मान्यता प्रदान रक्कम |
|---|---|---|
| १ | पुणे वनपरिक्षेत्रात कात्रज येथील फॉ. सर्वे क्र. ३९ येथे संरक्षक भिंत बांधण्याकरिता. | १,०७,४६,७०८/- |
| | **एकूण** | **१,०७,४६,७०८/-** |

**२)** सदर अंदाजपत्रकास खालील अटी व शर्तीस अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे -

**अ)** अंदाजपत्रक उपभोक्ता विभागाच्या सक्षम अधिकाऱ्यांनी साक्षांकित करणे आवश्यक आहे.

**आ)** प्रत्यक्ष काम करण्यापूर्वी संरक्षक भिंतीचे संकल्पन सक्षम अधिकाऱ्याकडून मंजूर करुन घ्यावे.

**इ)** प्रस्तुत काम हाती घेण्यापूर्वी जागेची खात्री करुन घेणे बंधनकारक राहील.

**ई)** अंदाजपत्रकात काही बाबींसाठी दरसूचीबाह्य दरांना अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडळ, पुणे यांनी स्वतंत्रपणे मंजुरी देणे आवश्यक आहे.

३) हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र.विअप्र.१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५.०५.२००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तीका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच अनुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र.१, परिच्छेद क्र.

१३४ अनुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्यात येत आहे.

४) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०११७१२५७२३३२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2017.01.17 13:00:09 +05'30'

**( वीरेंद्र तिवारी )**
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे.
५) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
६) उप वनसंरक्षक (भूमी अभिलेख), पनवेल.
७) उप वनसंरक्षक, पुणे.
८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
९) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.